**श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांची मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने नेमणूकीबाबत.**

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांकः मजीप्रा-२०१३/प्र.क्र.३५०/पापु-२३
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: २७ ऑगस्ट, २०१४

वाचा

१) **शासन आदेश, महसुल व वन विभाग, क्रमांक- डीपीटी १०१३/०३/ प्र.क्र.५/ई- १, दिनांक ३०.४.२०१४**
२) शासन निर्णय, **वित्त विभाग, क्र स्वीयेसे १०८९/प्र.क्र. २६२/सेवा २, दि. ८.०५.१९९०**
३) शासन निर्णय, **वित्त विभाग,क्र स्वीयेसे १०८८/प्र.क्र. १०९३/सेवा २, दि ८.७.१९९०**

शासन निर्णय-

महसुल व वन विभागाच्या संदर्भाधीन क्र १ मधील आदेशान्वये श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांची महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई या कार्यालयात मुख्य प्रशासकीय अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्त करण्यासाठी त्यांच्या सेवा पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाकडे सुपुर्द करण्यात आलेल्या आहेत.

श्री.उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांच्या सेवा स्वीकारुन त्यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई कार्यालयातील मुख्य प्रशासकीय अधिकारी या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यांत येत आहे. श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांच्या महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई या कार्यालयातील मुख्य प्रशासकीय अधिकारी या पदावरील प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती पुढील प्रमाणे विहित करण्यात येत आहेत. :-

१) प्रतिनियुक्तीचा कालावधी :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी हे ज्या तारखेला शासकीय सेवेतील पदाचा कार्यभार धारण करतील, त्या तारखेपासून म्हणजे दि ३.६.२०१४ रोजी पासून ( म.पु.) त्यांच्या स्वीयेतर सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा १ वर्षाच्या कालावधीकरिता चालू राहील.

अ) त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनास आवश्यक वाटली तर त्यांना प्रतिनियुक्तीचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतून केव्हाही परत बोलावण्याचा हक्क शासनास असेल.

ब) त्यांच्या सेवेची आवश्यकता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांना नसेल तर प्राधिकरण त्यांना शासन सेवेत परत पाठवू शकते. मात्र, ज्या दिनांकापासून तसे करावयाचे असेल त्या दिनांकापासून कमीत कमी तीन महिने अगोदर शासनास तसे कळविणे आवश्यक राहील.

२) वेतन :- श्री.उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी हे सदर प्रतिनियुक्तीच्या कालावधीत मुख्य प्रशासकीय अधिकारी हे पद धारण करतील. सदर कालावधीत त्यांना प्रतिनियुक्तीच्या पदाचे वेतन निश्चित करवून घेणे किंवा जर त्यांची स्वीयेत्तर सेवेत प्रतिनियुक्ती झाली नसती तर, त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या लगतपूर्वी त्यांनी जे पद धारण केले होते त्या पदाकरिता विहित केलेल्या रु १२०००-३७५-१६५०० या वेतनश्रेणीत मूळ विभागामध्ये जे वेतन घेतले असते ते वेतन अधिक संदर्भ क्र ३ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार प्रतिनियुक्ती भत्ता घेणे यापैकी कोणताही एक पर्याय स्वीकारता येईल .

३) महागाई भत्ता :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी हे राज्य शासनाकडील आपले वेतनमान कायम ठेवतील किंवा स्वीयेत्तर सेवेतील पदाशी संलग्न असणा-या वेतनात वेतन घेतील. त्याप्रमाणे त्यांना राज्य शासनाकडील किंवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडील नियमानुसार अनुज्ञेय असलेला महागाई भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

४) घरभाडे भत्ता/ स्थानिक पूरक भत्ता :- श्री.उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना राज्य शासनाच्या नियमानुसार वेळोवेळी अनुज्ञेय असेल त्याप्रमाणे घरभाडे भत्ता/ स्थानिक पूरक भत्ता मिळण्याचा हक्क असेल. पण महाराष्ट्र जीवन प्राधिकरण त्यांच्या स्वेच्छा निर्णयानुसार स्वीयेतर सेवेच्या नियमान्वये हे भत्ते मंजूर करु शकेल.

५) पदग्रहण अवधी वेतन आणि बदली प्रवास भत्ता :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांनी स्वीयेतर सेवेत बदली झाल्यानंतर आणि तेथून परत आल्यानंतर अशा दोन्ही वेळच्या पदग्रहण अवधीमध्ये त्यांचे वेतन व प्रवासभत्ता, राज्य शासनाच्या संबंधित नियमानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्याकडून देण्यात येतील.

६) प्रतिनियुक्तीच्या कालावधीत कर्तव्यार्थ केलेल्या प्रवासाकरीता प्रवास भत्ता :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना स्वीयेतर सेवेत रुजू झाल्यानंतर कराव्या लागणा-या प्रवासांकरीता, राज्य शासनाच्या संबंधित नियमान्वये किंवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या नियमान्वये प्रवासभत्ता आणि दैनिक भत्ता मिळण्याचा हक्क असेल.

७) रजा :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ हे नियम लागू असतील. महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ च्या नियम ८(२) मध्ये दिलेल्या कार्यपध्दतीचा काटेकोरपणे अवलंब करण्यात यावा. स्वीयेतर सेवेतून मुक्त झाल्यानंतर श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना परस्पर रजेवर जाण्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने परवानगी देता कामा नये. म्हणजेच प्रथम शासकीय सेवेत रुजू होऊन पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या सक्षम प्राधिका-याकडून नेहमीच्या पध्दतीने श्री.उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांनी आपली रजा मंजूर करुन घेतली पाहिजे.

स्वीयेतर सेवेच्या कालावधीत अथवा अखेरीस घेतलेल्या रजेच्या कालावधीबद्दल द्यावयाच्या रजा वेतनाचा व कोणत्याही पूरक भत्त्याच्या संबंधातील संपूर्ण खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाला सोसावा लागेल.

८) विकलांगता रजेबद्दल रजा वेतन :- स्वीयेतर सेवेत किंवा अशा सेवेमुळे आलेल्या विकलांगतेबद्दल विकलांगता रजा मंजूर करता येईल अशा रजेच्या संबंधात, अशी विकलांगता स्वीयेतर सेवा संपल्यानंतर उघडकीस आली तरीसुध्दा रजा वेतन देण्यास महाराष्ट्र जीवन प्राधिकरण जबाबदार असेल. अशा रजा वेतनाचा खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून वसूल करण्यांत येईल.

९) रजा वेतन आणि निवृत्तीवेतन अंशदान :-

अ) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने ) नियम १९८१ मधील नियम ४५ अंतर्गत परिशिष्ट -४ मध्ये तसेच संदर्भ क्र २ येथील शासन निर्णयात विहित केलेल्या दरानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून रजावेतन आणि निवृत्तीवेतन अंशदाने देण्यात येतील.

ब) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रत्येक वित्तीय वर्षाच्या अखेरीपासून १५ दिवसांच्या आत किंवा वित्तीय वर्ष संपण्यापूर्वी स्वीयेत्तर सेवेतील प्रतिनियुक्ती समाप्त होत असेल तर स्वीयेतर सेवेच्या अखेरीस वार्षिक रजावेतन व निवृत्तीवेतन अंशदाने देईल. हया रकमा दोन वेगवेगळया धनाकर्षाद्वारे ( पहिला रजा वेतनाच्या रकमेचा व दुसरा निवृत्तीवेतन अंशदानाच्या रकमेचा ) उपसचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२ यांच्याकडे पाठविणे आवश्यक आहे. सदर धनाकर्ष बृहन्मुंबईत कोणत्याही अनुसूचीत बँकेचे व उपसचिव, पाणी पुरवठा विभाग, मंत्रालय यांच्या नावे काढलेले असणे आवश्यक आहे.

सदर अंशदानाच्या रकमा पुढील लेखाशीर्षाखाली जमा दर्शविण्यात याव्यात.

| | |
|---|---|
| २०७१-निवृत्तीवेतन व इतर सेवा निवृत्ती लाभ, | २०७१-Pension & other Retirment Benefits |
| ०१- नागरी | ०१-Civil |
| (२०७१०१०३ ) ३८ | १०१- Super Annuation & Retirment Allowances (२०७१०११०३) ३८ |

क) स्वीयेतर सेवेतील श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी, यांच्या बाबतीतील, रजा वेतनाची किंवा निवृत्तीवेतनाची देय असणारी अंशदाने पूर्वोक्त कालावधीत दिली गेली नाहीत तर , शासनाने स्पष्टपणे सूचना दिलेली नसल्यास, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण हे अदत्त अंशदानाच्या रकमेवर, म्हणजेच पूर्वोक्त कालावधी संपण्याच्या तारखेपासून अंशदाने अंतिमरित्या दिल्याच्या तारखेपर्यंत देय होणा-या रकमेवर अनुज्ञेय दराने शासनाला व्याज देईल. कोणत्याही बाबीदाखल शासनाकडून वसूल करावयाच्या येणे रकमांची अशा अंशदानामधून वजावट करण्यांत येऊ नये.

१०) रजामुदती प्रवास सवलत :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना राज्य शासनाच्या संबंधित नियमातील तरतुदीनुसार रजामुदती प्रवास सवलत मिळण्याचा हक्क असेल. या संबंधातील खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सोसावा लागेल.

११) वैद्यकीय सवलती :- श्री. उदय जाधव , अपर जिल्हाधिकारी यांना महाराष्ट्र नागरी सेवा (वैद्यकीय उपचार) नियम, १९६१ अनुसार अनुज्ञेय असणा-या वैद्यकीय सुविधांपेक्षा कमी प्रतीच्या नसतील अशा सुविधा मिळण्याचा हक्क असेल आणि त्यावरील खर्च महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सोसावा लागेल.

१२) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीची वर्गणी :- श्री. उदय जाधव , अपर जिल्हाधिकारी यांनी प्रतिनियुक्तीच्या कालावधीत भविष्य निर्वाह निधीची मासिक वर्गणी दरमहा त्यांच्या वेतनातून भरणे आवश्यक आहे. सदर रकमेचा धनादेश त्यांचे भविष्य निर्वाह निधी खाते महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ) एक /दोन, महाराष्ट्र, मुंबई /नागपूर यापैकी ज्या महालेखापालांकडे असेल त्या महालेखापालांच्या नावे काढून भविष्य निर्वाह निधी अनुसूचीसह त्यांच्याकडे पाठविण्यात यावा.

१३) विभागीय चौकशी :- जर श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांच्याविरुध्द विभागीय चौकशी सुरु करावयाची असेल तर त्यांना त्यांच्या मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल. शासन त्यांना निर्वाह भत्ता देईल. परंतु तो महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून वसूल करण्यांत येईल.

१४) बोनस/सानुग्रह प्रदान:- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना बोनस किंवा सानुग्रह प्रदान अनुज्ञेय नाही. तथापि, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामध्ये बोनस किंवा सानुग्रह प्रदान जाहीर करण्यात येत असल्यास (त्यांच्यावर बोनस देण्याचे कायदेशीर बंधन नसले तरीही ) महामंडळाने जाहीर केलेले सानुग्रह प्रदान स्वीकारण्यास श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना परवानगी देता येईल.

१५) गट विमा योजना :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांच्या वेतनातून दरमहा रु.४८०/- (रुपये चारशे ऐंशी फक्त ) इतकी रक्कम राज्य/ केंद्र शासकीय कर्मचारी गट विमा योजनेच्या वर्गणीपोटी महाराष्ट्र जीवन प्राधकरणास दरमहा वसूल करील आणि ही रक्कम धनादेशाद्वारे महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) एक, महाराष्ट्र, मुंबई यांच्याकडे पाठवेल, सदर रक्कम ८०११ विमा आणि निवृत्तीवेतन निधी राज्य शासकीय विमा निधी (१) (८०११००५९) ७९ (८०११-Insurance & Pension Fund State Govt= Insurance Fund (१)(८०११००५९) या लेखाशीर्षाखाली जमा दर्शविण्यात यावी. सदर वर्गणी भरण्यास विलंब करण्यात आल्यास विलंब कालावधीत दंडनीय दराने व्याज आकारण्यात येईल.

१६) कर्ज आणि अग्रिम :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत, भविष्य निर्वाह निधी परतावा/ प्राप्त/ ना- परतावा अग्रिम, घरबांधणी अग्रिम, मोटारकार अग्रिम, वैयक्तिक संगणक अग्रिम मंजूर करण्यास शासन (महसुल व वन विभाग) सक्षम असेल. याबाबतचे त्यांचे अर्ज महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे मंजूरीसाठी पाठविण्यात यावे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने त्यांना सदर अग्रिम मंजूर करु नये.

१७) प्रतिनियुक्तीवर असतांना रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर नियुक्ती :- श्री. उदय जाधव , अपर जिल्हाधिकारी हे प्रतिनियुक्तीच्या कालावधीत रजेवर गेल्यास किंवा प्रशिक्षणासाठी गेल्यास आणि ते धारण करीत असलेल्या पदावर अन्य अधिका-याची नियुक्ती करण्यात आली आणि रजेवरुन अथवा प्रशिक्षणावरुन परत आल्यानंतर त्यांची नियुक्ती अन्य पदावर करण्यात आली तर रजा वेतन, वेतन, पदग्रहण अवधी, सक्तीचा खोळंबा कालावधी इत्यादीबाबत सर्व खर्च रजा समाप्तीच्या अथवा प्रशिक्षण समाप्तीच्या दिनांकापासून ते अन्य पदाचा कार्यभार धारण करणे या दिनांकापर्यंत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास सोसावा लागेल.

१८) निवासी शिपायाऐवजी रोख भत्ते :- श्री. उदय जाधव , अपर जिल्हाधिकारी यांना प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वी निवासी शिपायाऐवजी रोख भत्ता अनुज्ञेय असल्यास किंवा महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील अधिका-यांना निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असल्यास, श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत त्याच दराने निवासी शिपायाऐवजी रोखभत्ता अनुज्ञेय असेल. मात्र असा भत्ता घेण्यापूर्वी निवासी शिपाई देण्यात आलेला नाही असे प्रमाणपत्र श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांनी देणे आवश्यक राहील.

१९) प्रतिनियुक्ती कालावधीत देशात/ परदेशात प्रवास :- महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे प्रतिनियुक्तीवर असतांना सदर प्राधिकरणाच्या कामासंबंधात देशात कोठेही प्रवास करावयाचा झाल्यास शासनाच्या पूर्वपरवानगीची आवश्यकता असणार नाही, मात्र प्राधिकरणाच्या कामाच्या संबंधात परदेशी जावयाचे असल्यास, शासनाची पूर्व परवानगी आवश्यक असेल. त्याचप्रमाणे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या शासकीय, निम शासकीय कामानिमित्त अथवा खाजगी संस्थांच्या समारंभासाठी देशांतर्गत प्रवास करावयाचा असल्यास त्यासाठी शासनाची पूर्वपरवानगी घेणे आवश्यक राहील.

२०) प्रपत्र बढती :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी हे प्रतिनियुक्तीवर असतांना त्यांची मूळ विभागात बढती होण्याची वेळ आली असेल तर सर्वसाधारणपणे त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेऊ नये. तथापि, सक्षम प्राधिका-याने त्यांची प्रतिनियुक्ती पुढे चालू ठेवली तर त्यांना प्रतिनियुक्ती भत्ता न देता निकट -निम्नता नियमानुसार बढतीच्या पदाचे वेतन मंजूर केले जाईल आणि निकटनिम्नता नियमाचा लाभ सहा महिन्यानंतर अनुज्ञेय असणार नाही.

२१) कायमचे समावेशन :- जर मागाहून श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांची महाराष्ट्र जीवन प्राधकरणाच्या सेवेमध्ये कायमचे सामावून घेतले जाण्याची इच्छा असेल तर त्यांना सामावून घेतले जाईल त्या दिनांकापासून ते शासकीय सेवेतून निवृत्त झाल्याचे मानले जाईल.

२२) शासनाने वेळोवेळी विहित केलेले नियम लागू करणे :- श्री. उदय जाधव, अपर जिल्हाधिकारी यांना प्रतिनियुक्तीच्या कालावधीत शासन वेळोवेळी जे नियम करील किंवा जे कार्यकारी आदेश निर्गमित करील ते नियम/ कार्यकारी आदेश यथास्थिती लागू असतील.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक - स्वीयेसे १०८५/८५३/सेवा ८, दिनांक १८ जुलै १९८५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यांत येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२६१३१४१६१०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sawant Mahesh B

Digitally signed by Sawant Mahesh B
DN: CN = Sawant Mahesh B, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation Department
Date: 2014.08.27 15:11:57 +05'30'

(महेश भ. सावंत)
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरिमन पॉईंट, मुंबई २१
२. श्री. उदय जाधव, मुख्य प्रशासकीय अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर, नरिमन पॉईंट, मुंबई- २१
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई ( लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता )
४. महालेखापाल,महाराष्ट्र -२ नागपूर (लेखा परीक्षा व लेखा अनुज्ञेयता )
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (सेवा ) सामान्य प्रशासन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
८. मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,

९. सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग (का. क्र. १४) मंत्रालय, मुंबई
११. वित्त विभाग ( सेवा- ८) मंत्रालय, मुंबई
१२. महसुल व वन विभाग (ई १) मंत्रालय मुंबई ३२
१३. गोपनिय लिपिक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१४.निवड नस्ती, पापु २३